**विधानमंडळ/संसद सदस्यांकडूनआलेल्या पत्र/अर्ज/निवेदनांना पोच देणे/त्यावर सत्वर कार्यवाही करणे, शासकीय कार्यक्रमांना लोकप्रतिनिधींना आमंत्रित करणे, त्यांचे नाव निमंत्रणपत्रिकेवर स्थापणे इत्यादीबाबत मार्गदर्शक तत्त्वे.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक विमस-१०१०/प्र.क्र.६३/०७/१८ (र. व का.),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१०.

**संदर्भ :- शासन परिपत्रक क्रमांक-विमस/१००७/प्र.क्र.३६/०७/१८/(रवका). दिनांक ५ एप्रिल २०१०.**

## परिपत्रक

विधानसभा विशेष हक्क समितीच्या दिनंक २२ जुलै २०१० रोजी पार पाडलेल्या बैठकीत सन्माननीय विधानमंडळ सदस्यांना सन्मानजनक वागणूक मिळण्यासाठी व भविष्यात त्यांच्या तक्रारी येऊ नयेत या दृष्टीकोनातून राज्यातील जिल्हा/तालुका/ग्राम पातळीवरील सरसकट सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालयात या संदर्भातील परिपत्रकांची, मुख्यत्वे दिनांक ५ एप्रिल २०१० रोजी निर्गमित करण्यात आलेल्या परिपत्रकाची प्रत पाठवून संबंधीत अधिकारी व कर्मचाऱ्यांना त्यातील मार्गदर्शक तत्वांबाबत अवगत करण्याबाबत तसेच उक्त मार्गदर्शक तत्वांची काटेकोर अंमलबजावणी करण्यासंदर्भात निर्णय घेतलेला आहे, त्यानुसार कार्यवाही होणे आवश्यक आहे.

२. विधानमंडळ/संसद सदस्यांकडून आलेल्या पत्र/अर्ज/निवेदनांना पोच देणे याद्वारे सत्वर कार्यवाही करणे. त्यांना शासकीय अधिकाऱ्यांनी/कर्मचाऱ्यांनी आदराची व सौजन्यपूर्ण वागणूक देण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आहेत. अलिकडेच संदर्भाधीन शासन परिपत्रक दिनांक ५ एप्रिल २०१० अन्वये यासंबंधी सविस्तर मार्गदर्शक सूचना पुन्हा निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर परिपत्रकान्वये सर्व मंत्रालयीन विभागांना त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास ही बाब आणण्याचे निर्देश देण्यात आलेले आहेत. तथापि याप्रमाणे कार्यवाही होत नसल्याचे वरीलप्रमाणे शासनाच्या निदर्शनास आणण्यात आलेले आहे.

४. उपरोक्त परिस्थितीत वरीलप्रमाणे शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विशेषकरुन दि.५ एप्रिल २०१० अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना प्रत्येक प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त सर्व विभाग प्रमुख/

कार्यालय प्रमुख/निम शासकीय कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास तात्काळ आणवेत असे निर्देश पुनश्चः देण्यात येत आहेत. सदर मार्गदर्शक तत्वांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी व त्यामध्ये कुचराई झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेवर योग्य ती शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात यावी.

५. उपरोक्त दि.५ एप्रिल २०१० चे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००४०६१६५७०३००१ आहे.

६. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक 201009281608340001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( जे. पी. डांगे )**
**मुख्य सचिव**

प्रति,

सर्व सन्माननीय संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य,
राज्यपालांचे सचिव (५प्रती)
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती)
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव (५प्रती)
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे कार्यालय,
*मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांनी त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागप्रमुख / कार्यालयप्रमुख यांच्या निदर्शनास वरील बाब आणावी.)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई, (५ प्रती)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती

* पत्राने